**श्री.जी.सु.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक, यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१६७/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० ऑक्टोबर, २०२०

**शासन आदेश**

वाचा : १) समक्रमांकाचे दिनांक २७-११-२०१८ चे शासन आदेश.
२) सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रतिनि-२०१८/प्र.क्र.१३०/१२-अ, दिनांक ३०-११-२०१८ चे शासन आदेश.
३) सामान्य प्रशासन विभाग, क्र. साप्रआ-१२१८/प्र.क्र.२८२/१९, दिनांक ०३-१२-२०१८ चे कार्यालयीन आदेश.

संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक २७-११-२०१८ च्या आदेशान्वये श्री.जी.सु.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक, सामान्य प्रशासन विभाग, यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने, **संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर**, यांच्या कार्यालयात लिपिक, वर्ग-३ या पदावर प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. सदरहू प्रतिनियुक्तीच्या पदावर संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ३०-११-२०१८ च्या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक ०३-१२-२०१८ च्या कार्यालयीन आदेशान्वये श्री. पांढरीकर यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी दिनांक ०३-१२-२०१८ च्या कार्यालयीन आदेशान्वये कार्यमुक्त करण्यात आले होते.

२. श्री. पांढरीकर हे दिनांक **दिनांक ०४-१२-२०१८ पासून** संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ( वनामती ) नागपूर, येथे कार्यरत असून त्यांचा २ वर्षाचा प्रतिनियुक्ती कालावधी **दिनांक ०३-१२-२०२० रोजी संपुष्टात येणार आहे.**

३. मंत्रालयीन विभागात लिपिक-टंकलेखक संवर्गातील **पदे मोठया प्रमाणात** रिक्त **आहेत.** यास्तव श्री.जी.सु.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक **यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी समाप्त होण्यापूर्वी,** संदर्भाधिन क्र. १ येथील आदेशातील परिच्छेद २ (ब) येथे नमूद केलेल्या अटीनुसार **त्यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून** श्री.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक, सामान्य प्रशासन विभाग यांच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा आदेशाच्या दिनांकापासून त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्यात येत आहेत.

४. श्री.जी.सु.पांढरीकर, यांनी आपल्या मूळ विभागात ( सामान्य प्रशासन विभागात ) तातडीने रुजू होऊन तसा अहवाल या विभागास सादर करावा.

५. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर, यांनी श्री.जी.सु.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक यांना त्यांच्या मूळ विभागात रुजू होण्यासाठी तातडीने कार्यमुक्त करावे व दिनांक ३१-१०-२०२० नंतर कोणतेही वेतन व भत्ते अदा करु नये.

६. संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी श्री.जी.सु.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक, हे आपल्या विभागात रुजू झाल्याची वस्तुस्थिति या विभागास तात्काळ कळवावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२०१६०६४७२५०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VRISHALI VINOD BHINGARDE

Digitally signed by VRISHALI VINOD BHINGARDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administrative Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0863fc5c9cdcc85881943ea0d1a5438c42d27c0b1580feba5579800452b60209, serialNumber=6b870a94454e2b13ee0959c3370d5d53d60a17d4b6d3ed6077e40a0f53e7a053, cn=VRISHALI VINOD BHINGARDE
Date: 2020.10.20 16:08:52 +05'30'

**( वृषाली.वि.भिंगार्डे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.जी.सु.पांढरीकर, लिपिक-टंकलेखक, **(संबंधित कार्यालयामार्फत)**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२ सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्याची सेवा प्रत्यावर्तीत केल्यामुळे याबाबत त्यांनी संबंधित कार्यालयाकडे पाठपुरावा करावा.
३. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४००१०.
४. उप सचिव (का-१२अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ).